**श्री.मनिष गणेशराव सांगळे, अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी तथा प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा यांना व्यवस्थापकीय संचालक, साहित्यरत्न लोकशाहीर अण्णा भाऊ साठे विकास महामंडळावर प्रतिनियुक्ती देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन आदेश क्रमांकः एमपीसी-२०२३/प्र.क्र.३८/महामंडळे**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार इमारत, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: २० जुलै, २०२३

वाचा : १) श्री.मनिष गणेशराव सांगळे, अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी तथा प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा यांचे दिनांक २३/०३/२०२३ चे पत्र.
२) ग्रामविकास विभाग यांचे क्र.मविसे-१०२३/प्र.क्र.२६/२००३/आस्था-३, दि.१६/०३/२०२३ चे पत्र.
३) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०११/प्र.क्र.१३७/कार्यासन १२, दि.१७/१२/२०१६.
४) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०१६/प्र.क्र.५१०/कार्यासन १२, दि.१६/०२/२०१८.

**शासन आदेश :**

संदर्भ क्र. २ येथील पत्रान्वये ग्रामविकास विभागाने श्री मनिष गणेशराव सांगळे, अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी तथा प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा यांची सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या अधिपत्याखालील व्यवस्थापकीय संचालक, लोकशाहीर अण्णा भाऊ साठे विकास महामंडळावर प्रतिनियुक्ती करण्यास सहमती दर्शविली आहे. सदर वस्तुस्थिती लक्षात घेता, श्री.मनिष गणेशराव सांगळे, अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, तथा प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा यांची व्यवस्थापकीय संचालक, साहित्यरत्न लोकशाहीर अण्णाभाऊ साठे विकास महामंडळ या पदावर १ वर्षाकरिता खालील अटीच्या अधीन राहून प्रतिनियुक्ती करण्यात येत आहे.

१) श्री. मनिष गणेशराव सांगळे, अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी तथा प्रकल्प संचालक जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा हे ज्या तारखेला प्रतिनियुक्तीच्या पदावर रुजू होतील त्या तारखेपासून त्यांच्या प्रतिनियुक्तीच्या सेवेचा प्रारंभ होईल आणि ज्या तारखेला ते आपल्या मूळ पदाचा कार्यभार पुन्हा स्विकारतील त्या तारखेला त्यांची प्रतिनियुक्तीवरील सेवा समाप्त होईल.

२) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनाला आवश्यक वाटली तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्यांना परत बोलावण्याचा अधिकार शासन/सक्षम प्राधिका-यास राहील.

३) जर त्याची प्रतिनियुक्तीवरील सेवा स्वीयेत्तर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही तर त्यांना मूळ विभागाकडे परत पाठविण्याची मुभा स्वीयेतर नियोक्त्याला राहील. मात्र याप्रमाणे परत पाठविण्यापूर्वी स्वीयेतर नियोक्त्याने शासनाला / सक्षम प्राधिका-याला तीन महिन्यांची नोटीस दिली पाहिजे.

४) श्री मनिष गणेशराव सांगळे, अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी तथा प्रकल्प संचालक जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा यांनी मूळ विभागाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे, अशी कमीत कमी तीन महिन्यांची लेखी नोटीस शासनाला / सक्षम प्राधिका-याला दिल्यानंतर त्यांना मूळ विभागाकडे प्रत्यार्पित करण्याबाबतचा निर्णय घेण्यात येईल.

२. ग्रामविकास विभागाने वाचा येथील संदर्भ क्र. २ येथील दिनांक १६/०३/२०२३ च्या पत्रान्वये श्री. मनिष गणेशराव सांगळे यांना व्यवस्थापकीय संचालक, लोकशाहीर अण्णा भाऊ साठे विकास महामंडळ या पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती देण्यास सहमती दर्शविली असल्याने श्री. मनिष गणेशराव सांगळे यांना प्रतिनियुक्तीच्या पदावर रुजू होण्याकरिता ग्रामविकास विभागाने त्वरित कार्यमुक्त करावे.

३. श्री.मनिष गणेशराव सांगळे यांची या आदेशान्वये व्यवस्थापकीय संचालक या पदावर प्रतिनियुक्तीने करण्यात येत असल्याने सध्या सदर पदावर कार्यरत असलेले श्री.अनिल अहिरे, अवर सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांना या आदेशान्वये तात्काळ कार्यमुक्त करण्यात येत आहे.

४. महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी स्वीयेत्तर सेवा...इ.) नियम १९८१ मधील नियम ४० (परिशिष्ट-२) मधील तसेच सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०११/प्र.क्र.१३७/कार्यासन १२, दि.१७/१२/२०१६ या मधील सर्व अटी व शर्ती लागू राहतील.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२३०७२०११५६०३८४२२ असा आहे. हा शासन आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SOMNATH NAMDEO BAGUL

Digitally signed by SOMNATH NAMDEO BAGUL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=b01714c1480a47cec5943a1c3c73ea95af0534418cf92d1ac844331c4116879d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=4807C89831881EDE55B0D82CB9991539D1BD33C6F8A64931D9194D5E2CBDCF56, cn=SOMNATH NAMDEO BAGUL
Date: 2023.07.20 12:02:48 +05'30'

**( सो.ना.बागुल )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्री.मनिष गणेशराव सांगळे, अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी तथा प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा.

**प्रत-**

१. प्रधान सचिव, ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. व्यवस्थापकीय संचालक, लोकशाहीर अण्णा भाऊ साठे विकास महामंडळ मर्या.मुंबई.
४. सह सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. अवर सचिव (श्री.अनिल अहिरे) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. निवडनस्ती.